**लेखाशिर्ष २२३५ -२२४१ अंतर्गत ( अनिवार्य) २७ लहान बांधकामे या उद्दिष्टांतर्गत पुरवणी मागणीद्वारे अर्थसंकल्पित केलेला निधी वितरित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**महिला व बाल विकास विभाग**

**शासन निर्णय क्र. पुरक-२०२१/प्र.क्र.६६/का-७ अ**

नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,

मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.

दिनांक: ०४ फेब्रुवारी,२०२२.

**<u>संदर्भ:</u>**-आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांचे पत्र क्र.मबाविआ / बांधकाम /२०२१-२२ / पुरक मागणी /, दि. ३१ ऑगस्ट, २०२१.

**<u>प्रस्तावना:-</u>**

पंडित जवाहरलाल नेहरु उद्योग केंद्र (बाल सुधारगृह), येरवडा, पुणे ही संस्था बालगृहाची असून या संस्थेच्या इमारती अत्यंत जुन्या व काही इमारती मोडकळीस आल्या आहेत. सदर बालगृहे / निरीक्षणगृहे ही बालन्याय ( मुलांची काळजी व संरक्षण ) अधिनियम २०१५ च्या तरतुदी अंतर्गत कार्यरत आहेत. तसेच, महिला व बाल विकास विभागाच्या अधिनस्त विविध शासकीय संस्थांच्या इमारतींची दुरुस्ती करण्यात येत असून यामध्ये आठ शासकीय बालगृहे / निरीक्षणगृहे, शासकीय भिक्षेकरीगृहे इत्यादी संस्थांच्या इमारत दुरुस्तीच्या कामांचा समावेश आहे. महात्मा गांधी प्रशासन प्रशिक्षण संस्था, पुणे येथील वसतिगृह इमारतीचे नुतनीकरणाचे कामही अपूर्ण आहे. यास्तव सदर संस्थांच्या इमारतींची दुरुस्ती व नूतनीकरणाच्या कामासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

महिला व बाल विकास विभागाच्या अधिनस्त पंडित जवाहरलाल नेहरु उद्योग केंद्र, येरवडा, पुणे या संस्थेतील इमारतींचे बळकटीकरण, महिला व बाल विकास विभागाच्या राज्यातील विविध शासकीय संस्थांच्या इमारतींची दुरुस्ती आणि महात्मा गांधी प्रशासन प्रशिक्षण संस्थेच्या पुणे येथील वसतिगृह इमारतीचे नुतनीकरण या कामांसाठी लेखाशिर्ष २२३५ -२२४१ अंतर्गत ( अनिवार्य) २७ लहान बांधकामे या उद्दिष्टशीर्षाखाली सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी पुरवणी मागणी द्वारे मंजूर तरतुदीच्या ७५ % च्या मर्यादेत रु.३७.५० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरित व खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लाखात)

| अ.क्र. | लेखाशिर्ष | पुरवणी मागणी द्वारे मंजूर तरतूद | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| | २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण<br>(०१) राज्य<br>(०१)(०४) इमारतींची दुरुस्ती(अनिवार्य)<br>२७-लहान बांधकामे<br>मागणी क्र. एक्स -१ **(२२३५-२२४१)** | ५०.०० | ३७.५० |

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. त्यानुसार आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी वित्त विभागाच्या दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या बाबींची तसेच यासंदर्भात वित्त विभागाने निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना, प्रचलित निकष, वित्तीय अधिकाराचे प्रत्यायोजन यांचे काटेकोर पालन करावे.

३. याबाबत सन २०२१-२२ करीता वरील लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला निधी खर्च होईल व त्याबाबतचे कामनिहाय उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी घ्यावी.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौपचारिक संदर्भ क्र.१४/व्यय-६, दिनांक २५.०१.२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२२०२०८१२४१३३६८३० असा आहे. सदरचा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SUNIL DEORAO SARDAR
Date: 2022.02.08 12:43:55 +05'30'

**( सुनिल सरदार )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे,
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई,
३) महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर,
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर/मुंबई उपनगर,
५) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे ( आयुक्तालय,पुणे मार्फत ),
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी(आयुक्तालय,पुणे मार्फत),
७) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी(आयुक्तालय,पुणे मार्फत),
८) कार्यासन(व्यय-६/अर्थसंकल्प-७) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई,
९) कक्ष अधिकारी (का.४), महिला व बाल विकास विभाग,मंत्रालय,मुंबई,
यांना सदर निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह अग्रेषित,
१०)निवड नस्ती का-७ अ.